"पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर रोपवाटिका योजना" राष्ट्रीय कृषि विकास योजने अंतर्गत राबविण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- फरोवा-२०२०/प्र.क्र. ९७ /१३-अे,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- ०९ सप्टेंबर, २०२०.

संदर्भ :- कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.मराफऔवमं/राकृवियो-भारोवा/ १८८५६/२०२०, दिनांक १२/८/२०२०

**प्रस्तावना:-**

राज्यात मोठया प्रमाणावर भाजीपाला क्षेत्र आहे. तथापि भाजीपाला क्षेत्रासाठी अशी कोणतीही मोठी योजना राज्यस्तरावर कार्यान्वित नाही. भाजीपाला उत्पादनाला प्रोत्साहन देऊन शेतक-यांचे उत्पन्न वाढविण्याच्या दृष्टीने "पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर रोपवाटिका योजना" राष्ट्रीय कृषि विकास योजने अंतर्गत राबविण्याचे प्रस्तावित आहे. प्रकल्पासाठीची प्रस्तावित खर्च मर्यादा व अनुदानाची मर्यादा ही प्रचलित केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय फलोत्पादन अभियान अंतर्गत खर्च व अनुदान मर्यादेनुसार असल्याने सदर प्रकल्प राष्ट्रीय कृषि विकास योजनेमधून राबविण्यास मान्यता देण्यासाठी प्रस्ताव राष्ट्रीय कृषी विकास योजनेची अंमलबजावणी व संनियत्रणासाठी स्थापित केलेल्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीसमोर (SLSC) मान्यतेसाठी सादर करण्यात आला असता, सदर प्रस्तावास समितीचे अध्यक्ष तथा मुख्य सचिव यांनी मान्यता दिल्याने याबाबत उचित शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

भाजीपाला उत्पादनाला प्रोत्साहन देऊन शेतक-यांचे उत्पन्न वाढविण्याच्या दृष्टीने "पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर रोपवाटिका योजना" राष्ट्रीय कृषि विकास योजने अंतर्गत राबविण्यास सदर शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

**२. "पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर रोपवाटिका योजनेचे स्वरुप खालील प्रमाणे राहिल -**

**२.(१) योजनेचे महत्व** :- महाराष्ट्र राज्य हे फलोत्पादनामध्ये अग्रेसर असून राज्यात मोठया प्रमाणात फळे व भाजीपाला पिकांचे व्यवसायिक पध्दतीने लागवड करुन उत्पादन घेतले जाते. तसेच त्यांची निर्यातही मोठया प्रमाणात करण्यात येते. मागील २ ते ३ वर्षापासून भाजीपाला पिकाचे निर्यातक्षम व विषमुक्त उत्पादन करण्याकडे शेतक-यांचा कल वाढत आहे. त्यामुळे भाजीपाला बियांण्याच्या चांगल्या जाती व चांगली रोपे यांची मागणी वाढत आहे. त्यादृष्टीने भाजीपाला रोपांची नियंत्रीत वातावरणामध्ये तयार झालेली किड व रोगमुक्त भाजीपाला रोपांची मागणी मोठया प्रमाणात वाढत आहे. त्यामुळे राज्यातील प्रत्येक तालुक्यात दर्जेदार किड व रोग मुक्त रोपे तयार करणाऱ्या लहान रोपवाटिका उभारण्यास वाव आहे.

**३. योजनेचे उद्देश :-**

१) भाजीपाला पिकांची दर्जेदार व किडरोग मुक्त रोपे निर्मिती करुन उत्पन्न व उत्पादनात वाढ करणे.

२) रोपवाटिकेमुळे स्थानिक शेतक-यांना शेतीपुरक व्यवसायाची संधी उपलब्ध करुन देणे.

३) पिक रचनेत बदल घडवून आणणे व नविन तंत्रज्ञानाचा वापर करणे.

४) शेतक-यांचे आर्थिक उत्पन्न व भाजीपाला उत्पादनात वाढ करणे.

**४. योजनेची व्याप्ती व उद्दिष्ट:-** राज्यातील सर्व तालुक्यात भाजीपाला व रोपवाटिका स्थापन करण्यासाठी ही योजना राबविण्यात यावी. सदर योजनेअंतर्गत ५०० लाभार्थी निवडीचे उद्दिष्ट ठरविण्यात येत आहे.किमान प्रत्येक तालुक्यास एक रोपवाटिका देण्यात यावी.

**५.योजनेतील घटक** :- भाजीपाला रोपवाटिका स्थापन करण्यासाठी खालील मुलभूत सुविधा उपलब्ध करून देणे आवश्यक आहे त्या पुढील प्रमाणे आहेत.

**१) पॉलीटनेल** - भाजीपाला रोपवाटिकेत बियाण्याची रुजवण करण्यासाठी आर्द्रता व तापमान यांचे संतुलन राखणे आवश्यक असते. यासाठी बियाण्याची रुजवण वर्षभर करण्यासाठी प्लॅस्टीक टनेल्स रोपवाटिकेतील अत्यावश्यक बाब गृहीत धरणेत आलेली आहे.

**२) शेडनेट** - बियाण्याची रुजवण झाल्यानंतर विक्रीयोग्य होण्याच्या कालावधीत रोपांना कठीणपणा (हार्डनिंग) आणणेसाठी ५ ते ६ दिवसाची पॉलीटनेलमधील रोपे शेडनेटमध्ये ठेवणे आवश्यक असते. सर्वसाधारणपणे ५० % सुर्यप्रकाश व ५० % सावली रोपांना उपलब्ध होणारे शेडनेट वापरण्यात येते. जेणेकरुन रोपे २१ दिवसापर्यंत खुल्या वातावरणात आणता येतील. तसेच रोपे शेडनेटमध्ये वाढताना त्यांचे किड व रोगापासून संरक्षण होईल तसेच खत व पाणी व्यवस्थापन झाल्याने दर्जेदार रोपे उत्पादन करता येईल.

**३) प्लॅस्टीक क्रेटस** :- रोपांची वाहतुक सुरक्षित करण्यासाठी प्लॅस्टिक क्रेटस प्रस्तावित करण्यात आलेली आहेत.

**६.लाभार्थी निवडीचे निकष :-**

१) अर्जदाराकडे स्वत:च्या मालकीची किमान ०.४० हे. (१ एकर) जमिन असणे आवश्यक आहे.

२)रोपवाटिका उभारण्यासाठी पाण्याची कायमची सोय असणे आवश्यक आहे.

३) माहिला कृषी पदवी धारकांना प्रथम प्राधान्य राहील.

४) महिला गटास द्वितीय प्राधान्य.

५) भाजीपाला उत्पादक अल्प व अत्यअल्प भूधारक शेतकरी व शेतकरी गट यांना प्राधान्य.

६) अनुसुचित जाती व जमाती यांना केंद्र सरकारच्या मापदंडा प्रमाणे लाभ देण्यात येईल.

७. (१) **भाजीपाला रोपवाटिका आराखडा** :- सदरहू योजनेचा वित्तीय आराखडा खालीलप्रमाणे असेल-

(रुपये लाखात)

| अ.क्र. | बाब | राफअ मापदंड | आर्थिक सहाय्य (५०%) | लाभार्थी संख्या | व्यापलेले क्षेत्र (हे.) | प्रकल्पखर्च (रु. लाखात) | राकृवियो मार्फत आवश्यक निधी (रु.लाखात) |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | शेडनेटगृह (१००० स्क्वेअर मी.) | रु.३.८० | रु.१.९० | ५०० | २०० | १९००.०० | ९५०.०० |
| २ | प्लॅस्टीक टनेल- २ युनिट | रु.०.६० | रु.०.३० | | | ३००.०० | १५०.०० |
| ३ | नॅपसॅक स्प्रेअर - १ नग | रु.०.०७६ | रु.०.०३८ | | | ३८.०० | १९.०० |
| ४ | प्लॅस्टिक क्रेटस- ६२ नग | रु.०.००२ | रु.०.०६२ | | | ६२.०० | ३१.०० |
| ५ | प्रशासकीय खर्च प्रकल्प खर्चाच्या १ टक्के | -- | -- | | | -- | ११.५० |
| | **एकूण** | | **२.३०** | | | **२३००** | **११६१.५०** |

**(२) रोपवाटिकांचा संभावीत वापर:-** **(१) भाजीपाला पिके** -टोमॅटो,वांगी,हिरवी मिरची,कोबी, फुलकोबी, शिमला मिरची, कांदा, इत्यादी व इतर पिके

(२) **फळपिके**- पपई,शेवगा इत्यादी.

८.**योजनेअंतर्गत तांत्रिक प्रशिक्षण** :- भाजीपाला रोपवाटिकांचा लाभ घेऊ इच्छिणाऱ्या शेतक-यांना तीन ते पाच दिवसांचे तांत्रिक प्रशिक्षण हॉर्टीकल्चर ट्रेनिंग सेंटर, तळेगाव दाभाडे किंवा कृषि विज्ञान केंद्र , बारामती येथे अनिवार्य राहिल.

९. **अर्थसहाय्याचे स्वरुप** :- सदर प्रकल्प राष्ट्रीय फलोत्पादन अभियानाच्या धर्तीवर राबविण्यात येईल. सदर योजनेअंतर्गत प्रकल्प उभारणीनंतर प्रथम हप्ता ६०% व उर्वरित द्वितीय हप्ता ४०% अनुदान वितरीत करण्यात येईल.

१०. **<u>आवश्यक निधी</u>** :- ३४ जिल्हयात ५०० रोपवाटिकांकरिता योजनेचा एकूण खर्च रु. २३०० लाख इतका असून राष्ट्रीय कृषी विकास योजनेतून सन २०२०-२१ साठी रु.११६१.५० लाख निधी उपलब्ध करून देण्यात येईल.

**११. <u>योजनेचा कालावधी</u> :- सदर योजनेचा कालावधी दोन वर्षाचा राहिल. (सन २०२०-२१ व २०२१-२२)**

**१२. <u>योजनेची अंमलबजावणी</u> :-**जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी यांचेमार्फत सदरची योजना राबविण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२००९०९१६२०२८७५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ashok Maroti Atram

Digitally signed by Ashok Maroti Atram
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e212845163abd708717bb4bef92b6886b147679a5af5a494e268689ab8d696dd, serialNumber=5f7eca1f400d866ea34324cea1a547aa04f0da0794a00bee126e8678172a15c5, cn=Ashok Maroti Atram
Date: 2020.09.11 12:57:22 +05'30'

**( अशोक आत्राम )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. विरोधी पक्ष नेता, विधान सभा/ विधान परिषद, महाराष्ट्र राज्य, विधानभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री, यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
३. आयुक्त कृषी, महाराष्ट्र राज्य,पुणे.
४. संचालक फलोत्पादन, कृषी आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,
५. सर्व विभागीय कृषी सहसंचालक.
६. सर्व जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी.
७. महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञेयता ) मुंबई /नागपूर,
८. महालेखापाल-१/२ , (लेखा परीक्षा ) मुंबई /नागपूर,
९. वरिष्ठ जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर,अमरावती,वर्धा,बुलढाणा,अकोला.
१०.संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
११.सहसंचालक लेखा व कोषागारे,संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन,५ वा मजला,मुंबई -३२,
१२.मा. मंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव.
१३.मा. राज्यमंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव.
१४.मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव.
१५.मा.मुख्यसचिव यांचे स्विय सहाय्यक
१६.अ.मु.स. नियोजन व वित्त यांचे स्विय सहाय्यक.
१७.अवर सचिव (राकृवि), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१८.कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), कृषि व पदुम (कृषि व फलोत्पादन) विभाग, मंत्रालय,मुंबई.
१९. निवड नस्ती (१३-अे).